**दिल्ली वेस, कारंजा लाड, ता. कारंजा, जि. वाशिम या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्तीच्या कामाच्या ब-१ निविदेस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्मारके २०१७/प्र.क्र.११९/सां.का.३**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : - १८ जानेवारी, २०१९.

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक स्मारके २०१७/प्र.क्र.११९/ सां.का.३, दिनांक ५ जुलै,२०१८
२) संचालक पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय मुंबई यांचे जा.क्र.स्मारके/ २०१८ /२२१५, दिनांक २६.०९.२०१८ चे पत्र .

**प्रस्तावना :-**

दिल्ली वेस, कारंजा लाड, ता. कारंजा, जि. वाशिम या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्ती कामाच्या रु.१,४६,९१,५६०/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कामाची निविदा कार्यवाही पुर्ण करुन न्युनतम निविदेचा प्रस्ताव संचालकांनी संदर्भ क्रमांक २ च्या पत्राव्दारे शासन मान्यतेस सादर केला आहे. सदर न्युनतम निविदेच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

दिल्ली वेस, कारंजा लाड, ता. कारंजा, जि. वाशिम या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन व दुरुस्ती कामाकरीता संचालकांकडून प्राप्त खालील न्युनतम निविदेस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| निविदाकराचे नाव | अंदाजपत्रकीय रक्कम रुपये | निविदा रक्कम रुपये | अभिप्राय |
|---|---|---|---|
| मे. एन जे काकडे | रु.१,४६,९१,५६०/- | रु.१,४४,०३,४९०/- | मे. एन जे काकडे यांची निविदा १०.७१ टक्के कमी दराची प्रथम क्रमांकाची (L-१) न्युनतम निविदा आहे. त्यामुळे सदर निविदा मंजूर करण्यास हरकत नाही. |

०२. सदर ऐतिहासिक राज्य संरक्षित स्मारकाचे जतन व दुरुस्तीची कामे ही विशिष्ट प्रकारची असून सदर कामे पुरातत्वशास्त्र संकेतानुसार करणे आवश्यक आहे. हे काम करण्यासाठी संचालक पुरातत्व यांनी सादर केलेल्या न्युनतम निविदेच्या प्रस्तावास महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ चा भाग पहिला उपविभाग ५ मधील अ.क्र. ६ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक २२० अन्वये प्रशासकीय विभागांना असलेल्या अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८ /प्र.क्र.६९/ अर्थसंकल्प-,३ दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी नियमानुसार योग्य ती विहीत कार्यपध्दती अनुसरुन तसेच या विभागाच्या क्रमांक स्मारक २०१६/ प्र.क्र.१३९/ सां.का.३, दि. दि. २४ नोव्हेंबर, २०१६ च्या शासन निर्णयाव्दारे विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर काम तज्ञाच्या देखरेखीखाली पुर्ण करावे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०११८१७३१५३५८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2019.01.19 11:05:25 +05'30'

**( शै.तु.जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) सहाय्यक संचालक, पुरातत्व विभाग, नागपूर
३) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (१ व २ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
४) महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा) मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७) जिल्हा कोषाधिकारी, नागपूर
८) अवर सचिव (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
९) निवड नस्ती, सां.का.३.